**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक: असप्र-१२१६/प्र.क्र.२०४ /१४**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २० जून, २०१७

**<u>संदर्भ</u>**- या विभागाचे समक्रमांकाचे दिनांक १६.११.२०१६ चे आदेश.

**शासन आदेश**

श्री. आ.ना.भोंडवे, अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांची सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भिय शासन आदेशान्वये प्रकल्प उपसंचालक, हवामान अनुकूल कृषी व्यवस्थापन कक्ष, मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. श्री.भोंडवे, अवर सचिव हे सदर प्रतिनियुक्तीच्या पदावर दिनांक २२.११.२०१६ (म.पू.) रोजी रुजू झाले आहेत. आता, श्री.भोंडवे, अवर सचिव यांनी वैयक्तिक अडचणीमुळे त्यांची प्रकल्प उपसंचालक या पदावरील प्रतिनियुक्ती संपुष्टात आणून त्यांच्या सेवा मूळ संवर्गात प्रत्यार्पित करण्याची विनंती केली आहे. श्री.भोंडवे, अवर सचिव यांनी केलेल्या विनंतीनुसार, त्यांची प्रकल्प उपसंचालक, हवामान अनुकूल कृषी व्यवस्थापन कक्ष, मुंबई या पदावरील प्रतिनियुक्ती या आदेशाद्वारे संपुष्टात आणून त्यांच्या सेवा मूळ संवर्गात प्रत्यार्पित करण्यात येत आहेत. श्री.भोंडवे, अवर सचिव यांना प्रतिनियुक्तीच्या पदावरुन कार्यमुक्त करण्याची पुढील कार्यवाही कृषी व पदुम विभागाने करावी .

२. श्री. भोंडवे, अवर सचिव यांची प्रत्यावर्तनानंतरची पदस्थापना शालेय शिक्षण व क्रिडा विभागातील रिक्त असलेल्या अवर सचिव पदावर करण्यात येत आहे.

३. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२०१७१९२३४१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.06.20 17:15:43 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. अ.मु.स. (सेवा), सा.प्र.वि.,
४. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग/कृषी व पदुम विभाग,
५. सह/उप सचिव/(आस्थापना),सार्वजनिक बांधकाम विभाग/ शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,
६. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजिवनी प्रकल्प, मुंबई-०५,
७. श्री. आ.ना.भोंडवे, अवर सचिव,
८. कार्यासन १४, निवड नस्ती.